आयसीटी योजना (तिसरा टप्पा) अंमलबजावणी संदर्भात आय.एल.अँङ.एफ्.एस्. एज्युकेशन टेक्नॉलॉजी सर्व्हिसेस लि. या संस्थेस निधी वितरीत करणेबाबत...
(पाचवी सहामाही)

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आयसीटी २०१४/प्र.क्र.२५ (१) /एस.डी-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३१ ऑगस्ट, २०१७

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०११/प्र.क्र.१२/संगणक, दि. २५/०३/२०१३
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०११/प्र.क्र.१२/संगणक, दि.०७/११/२०१३
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र. २५/एस.डी.१, दि.२६.०३.२०१४
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र. २५/एस.डी.१, दि.२८.०५.२०१४
५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५(२)/एस.डी.१, दि.३०/०७/२०१४
६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१,दि.०५/०२/२०१५
७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१,दि.०५/०३/२०१५
८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा. प्रशा-५, दि. २४/०७/२०१५
९) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : आयसीटी २०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१, दि. ११/९/२०१५
१०) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्रमांक : आयसीटी २०१५/प्र.क्र.१२५/एसडी.१, दि.२१/९/२०१५
११) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१,दि.१५/०१/२०१६
१२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : आयसीटी २०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१, दि. ३०/०३/२०१६
१३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : आयसीटी २०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१, दि. ०८/०६/२०१६
१४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : आयसीटी २०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१, दि. २०/१०/२०१६
१५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : आयसीटी २०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१, दि. २७/१०/२०१६
१६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : आयसीटी २०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१, दि. १७/०१/२०१७
१७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : आयसीटी २०१४/प्र.क्र.२५(१)/एस.डी.१, दि. १६/०३/२०१७
१८) राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान यांचे पत्र क्र. रामाशिअ/आयसीटी/टप्पा-३/आय.एल.ॲण्ड एफ.एस. ५ व २ सहामाही/(१३००/३०)/२०१६-१७, दिनांक निरंक
१९) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८/०४/२०१७

<u>**प्रस्तावना -**</u>

राज्यात केंद्र पुरस्कृत माहिती तंत्रज्ञान व दळणवळण (Information & Communication Technology) योजनेचा तिसरा टप्पा ५००० माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमध्ये राबविण्यास शासनाच्या संदर्भाधिन दि.२५/०३/२०१३ आणि दि.०७/११/२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजना BOOT तत्वावर राबविण्यात येत असून यासाठी निविदा प्रक्रियेव्दारे ५ वर्षासाठी BOOT तत्वावर प्रतिशाळा रुपये १७.९० लक्ष एवढया दराने योजना राबविण्यासाठी दोन ऑपरेटर्सची नियुक्ती करण्यात आलेली आहे. या

योजनेसाठी नियुक्त करण्यात आलेल्या दोन ऑपरेटर्सपैकी आय.एल.अँड.एफ्.एस्. एज्युकेशन टेक्नॉलॉजी सर्व्हिसेस लि. या संस्थेस दि. २५/०३/२०१३ च्या शासन निर्णयान्वये २५६० शाळा आणि दि.०७/११/२०१३ च्या शासन निर्णयान्वये १५९० शाळा मंजूर करण्यात आलेल्या आहेत. दि.०७/११/२०१३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले १५९० शाळांपैकी १३०० शाळांचा पाचव्या सहामाहीचा देय निधी रु.११६३.५० लक्ष व ६० शाळांच्या दुसऱ्या सहामाहीचा देय निधी रु.५३.७० लक्ष असा एकूण रु.१२१७.२० लक्ष इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानामार्फत सादर करण्यात आला आहे. तथापि, सन २०१७-१८ करिता आयसीटी योजनेकरिता केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झालेला नाही. सन २०१६-१७ करिता केंद्र शासनाने तिसऱ्या टप्प्याकरिता वितरित केलेल्या निधीपैकी रु.९३८ लक्ष निधी अखर्चित आहे. सदर रु.९३८ लक्ष निधी आय.एल्.अँड एफ्.एस. एज्युकेशन टेक्नॉलॉजी सर्व्हिसेस लि. यांची देयके अदा करण्यासाठी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय</u> -

शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी आय.एल.अँड.एफ्.एस्. एज्युकेशन टेक्नॉलॉजी सर्व्हिसेस लि. शी केलेल्या करारनाम्यातील मुद्दा क्र. ७.१ (ii) नुसार ५०% निधी पाच वर्षामध्ये विभागणी करुन प्रति सहामाही ५% निधी याप्रमाणे ऑपरेटरला अदा करण्याची तरतूद करण्यात आली आहे. यानुसार आय.एल.अँड.एफ्.एस्. एज्युकेशन टेक्नॉलॉजी सर्व्हिसेस लि.या संस्थेला दि.०७/११/२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या शाळांपैकी १३०० शाळांच्या पाचव्या सहामाहीच्या देय रकमेपैकी रु.९३८ लक्ष (रुपये नऊ कोटी अडतीस लक्ष फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१७-१८ या चालू आर्थिक वर्षाकरिता "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००) (०७) शाळांमध्ये माहिती व संदेशवहन तंत्रज्ञान योजना कार्यान्वित करणे (केंद्र हिस्सा) (२२०२ ३७९१) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षातंर्गत रु.१००००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध तरतूदीतून सदर खर्च भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१) यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.२) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.३) रक्कम ऑपरेटरच्या नांवे ECS व्दारे आंहरित करावी.

३.४) दि. २४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३.५) परिपत्रकातील "अ" व "ब" ची पूर्तता होत आहे.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१८/०४/२०१७ व दि.२४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचना नुसार करण्यात यावा. यासाठी अवर सचिव (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व सह सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**५.** सदर आदेश वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१८/०४/२०१७ च्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद अनुक्रमांक ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील १, २, ३,५, ६ व ७ मधील बाबी या आदेशासाठी लागू नाहीत. परिशिष्टातील मुद्दा क्र. ४ नुसार केंद्र शासनाचा निधी प्राप्त झाला असल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.३२७/अर्थोपाय, दि.१४/१०/२०१६ अन्वये दिलेले आहेत. दि.१८/०४/२०१७ रोजीच्या परिपत्रकातील मुद्दा क्र.१८ नुसार मागील वर्षाचा निधी या वर्षी (सन २०१७-१८ मध्ये) खर्च करण्यासाठी नियोजन विभाग व वित्त विभागाची अनौपचारिक संदर्भ क्र. अनुक्रमे ११८/१४७१, दिनांक २८/०६/२०१७ व ७९०/१७/व्यय-५, दिनांक ३१/०७/२०१७ अन्वये मान्यता घेण्यात आली आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८३११५०१५२५८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.08.31 14:52:30 +05'30'

**( डॉ.सुवर्णा खरात )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
६) राज्य प्रकल्प समन्वयक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई
७) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र½, मुंबई, नागपूर
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र½, मुंबई / नागपूर
९) सह सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) संचालक, लेखा व कोषागरे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३
११) अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२) सर्व वरिष्ठ लेखापरीक्षक (शिक्षण विभाग)
१३) अवर अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) वित्त विभाग (व्यय-५)/नियोजन विभाग
१५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, अर्थसंकल्प कार्यासन
१६) निवड नस्ती, एसडी-१.